सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता संनियंत्रण व मूल्यांकन योजना (२४०६ ८६२२) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२३/प्र.क्र.५४/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २२ ऑगस्ट,२०२३

**वाचा:-**

१) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक ( सामाजिक वनीकरण ) म.रा., पुणे, यांचे पत्र क्र.कक्ष-१/योजना/ प्र.क्र.६/सं.नि./२११/२०२३-२४,दि. ०८.०५.२०२३.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) म.रा., नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/ प्र.क्र.४३/१३२/२०२३-२४,दि. २४.०५.२०२३.

**प्रस्तावना :-**

महसूल व वन विभागांतर्गत सामाजिक वनीकरण शाखेतील कार्यरत असलेल्या विविध योजनांतर्गत करण्यात आलेल्या रोपवन कामांचे त्रयस्थ संस्थेमार्फत मुल्यांकन करणे व त्याची जिल्हास्तरावर अंमलबजावणी इ. कामे संनियंत्रण व मूल्यांकन (२४०६ ८६२२) या योजनेंतर्गत करण्यात येतात.

२. सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन वृक्षलागवड व संवर्धन करण्यासाठी सामाजिक वनीकरणांतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांचे संनियंत्रण व मुल्यमापन आणि सामाजिक वनीकरण (२४०६ ८६२२) या योजनेंतर्गत सन २०२३-२४ करिता २६.५० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा. नागपूर यांच्या दिनांक २४.५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), म.रा. पुणे यांच्या दिनांक ०८.०५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार सन २०२२-२३ मधील मूल्यांकन कामी देय असलेला निधी रु.९.१८ लक्ष आणि सन २०२३-२४ करीता मंजूर नियतव्ययाच्या अनुषंगाने रु.१६.५० लक्ष निधी असा एकूण रू.२५.६८ लक्ष रकमेच्या चालू बाब प्रस्तावास शासन मंजूरी प्रदान करून अनुदान उपलब्ध करून देण्याबाबत उक्त दिनांक २४.०५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये विनंती केलेली आहे. त्यानुसार सदर योजनेंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात संनियंत्रण व मुल्यमापन आणि सामाजिक वनीकरण (२४०६ ८६२२) या योजनेकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रू.२६.५० लक्ष नियतव्ययामधून संदर्भाधीन क्रमांक १ येथे नमूद वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक १२.०४.२०२३

मधील निश्चित करण्यात आलेल्या ४०% मर्यादेत निधी वितरित करणे आवश्यक आहे. तथापि,सद्यःस्थितीत संनियंत्रण व मुल्यमापन आणि सामाजिक वनीकरण (२४०६ ८६२२) या योजनेकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रू.२६.५० लक्ष नियतव्ययामधून वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करून दिल्यानुसार ३०% मर्यादेत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता संनियंत्रण व मूल्यांकन आणि सामाजिक वनीकरण (२४०६ ८६२२) योजनेकरिता रु.२६.५० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. त्यापैकी बीम्स प्रणावलीवर उपलब्ध ३० टक्के ( रू.५.३० लक्ष) निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२३-२४ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

४. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

५. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

६. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७**
**२४०६, वनीकरण व वन्यजीवन**
**(११) (३५) संनियंत्रण व मूल्यांकन आणि सामाजिक वनीकरण योजना (२४०६ ८६२२)**
**३३- अर्थसहाय्य**

७. सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक १ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रका नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८२२१२४१३१२४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

INGALE VINAYAK BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d79999ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B71557BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2023.08.22 12:44:43 +05'30'

**( वि. बा. इंगळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक ) (११ वृत्त )
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण (६ वृत्त )
६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे )
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी, मुंबई
११. वित्त विभाग,व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवडनस्ती फ-११.